**कोकण भवन, नवी मुंबई येथे हलविण्यात आलेल्या कार्यालयात काम करणा-या शासकीय कर्मचा-यांना विशेष रोख भत्ता**

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक विवाभ ११९१/२७७/९२/सेवा-५
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १५ मार्च १९९२.

पहा:- १] शासन निर्णय, क्रमांक टीआरजे १३७५/५४५-सी/ एसईआर-५, दिनांक १.४.१९७६.
२] शासन निर्णय, क्रमांक टीआरजे १३८२/सीआर-२२२/ एसईआर-५, दिनांक १३.३.१९८१.
३] शासन निर्णय, क्रमांक टीआरजे १३८२/सीआर २९९/ एसईआर-५, दिनांक १ जून १९८२.

शासन निर्णय:- शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक टीआरजे १३८२/सीआर-२९९/ एसईआर-५, दिनांक १ जून १९८२ द्वारे कोकण भवन, नवी मुंबई येथे हलविण्यात आलेल्या कार्यालयात काम करणा-या कर्मचा-यांना त्या निर्णयात निर्देशित केलेल्या दराने विशेष रोख भत्त्याचे सुधारित दर मंजूर करण्यात आले होते. यानंतर बसभाडयामध्ये मोठया प्रमाणावर वाढ करण्यात आली आहे. त्यामुळे प्रवासखर्चात बरीच वाढ झाली आहे. ही बस भाडे वाढ लक्षात घेऊन कोकण भवन, नवी मुंबई येथे काम करणा-या कर्मचा-यांना विशेष रोख भत्त्याचे नवीन सुधारित दर ठरवून ते दि. १.१.१९९२ पासून खालीलप्रमाणे द्यावेत असा शासनाचा आदेश आहे:-

| बस सुटण्याचे व कर्मचा-याच्या निवास-स्थानाच्या अधिक जवळ असलेले ठिकाण. | विशेष रोख भत्त्याचा दर दिनांक १.१.१९८२ पासून [प्रतिमाह] रुपये | विशेष रोख भत्त्याचा सुधारित दर दिनांक १.१.१९९२ पासून [प्रतिमाह] रुपये. |
|---|---|---|
| वांद्रे | १३०/- | २२०/- |
| दादर | १३०/- | २२० - |
| ठाणे | १३०/- | १७०/- |
| मानखुर्द | ७५/- | १२५/- |

२. विशेष रोख भत्त्याबाबतच्या इतर सर्व शर्ती यापूर्वी ठरविण्यात आल्या प्रमाणेच रहातील. परंतु या सवलतींबाबत स्पष्ट करण्यात येते की, मानखुर्द-बेलापूर रेल्वेमार्ग प्रवाशी वाहतुकीसाठी उपलब्ध झाल्यानंतरच्या दिनांकापासून विशेष रोख भत्त्याची पध्दत आपोआपच रद्द होईल.

३. वाढीव व विशेष रोख भत्त्यावरील खर्च नवीन मुंबईतील कार्यालयातील संबंधित प्रधान शिर्षाखालील मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. मंत्रालयातील सर्व संबंधित प्रशासकीय विभागांनी, वाढीव विशेष रोख भत्त्यापोटी येणारा खर्च, सुधारित अंदाज पत्रक करतांना विचारात घ्यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

मधुकर रा. तडवळकर

[मधुकर रा. तडवळकर]
अवर सचिव, वित्त विभाग.

प्रति,

[१] महालेखापाल, महाराष्ट्र १, मुंबई,
[२] अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
[३] निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
[४] मंत्रालयाचे सर्व विभाग,
[५] आयुक्त, मुंबई विभाग, मुंबई [२५ प्रती] कोकण भवन मधील, कार्यालयांना अग्रेषित करण्याच्या विनंतीसह.
[६] अध्यक्ष, ग्रेटर बॉम्बे स्टेट एम्पलॉईज फेडरेशन, द्वारा ए-६, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
[७] कोषागार अधिकारी, ठाणे, जिल्हा ठाणे,
[८] वित्त विभागातील कार्यासने सेवा ५, ६, ७, ८ व वेतन-७,
[९] निवड नस्ती, सेवा-५.